जि. कोल्हापूर येथील ईव्हीएम - व्हीव्हीपॅट मशीन्सच्या साठवणुकीकरीता गोदामाची दुरुस्ती :- प्रशासकीय मान्यता.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र.ईव्हीएम-२०१७/प्र.क्र.४०६/१७/३३
मंत्रालय मुंबई-४०००३२.
दिनांक :- २६ मार्च, २०२५

वाचा :- १) जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, कोल्हापूर यांचे पत्र क्र.कार्या-१०/निवडणूक/ईव्हीएम/आरआर/४७/२०२५, दि.२१.०२.२०२५
२)जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, कोल्हापूर यांचे पत्र क्र.कार्या-१०/निवडणूक/ईव्हीएम/आरआर/४६/२०२५, दि.२१.०२.२०२५
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९
४) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९

शासन निर्णय:-

जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, कोल्हापूर कार्यालयाकडून ईव्हीएम-व्हीव्हीपॅट मशीन्सच्या साठवणुकीसाठी आवश्यक असलेल्या गोदामांच्या दुरुस्तीसाठी सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत अंदाजपत्रक छाननी करुन तांत्रिक सहमतीसह तसेच मुख्य अभियंता यांचे शिफारशीसह रु.९,९५,८३२/- व रु.५,६६,३४४/- अशा एकुण रु.१५,६२,१७६/- इतक्या किमतीचा प्रस्ताव संदर्भ क्र.१ ते २ च्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यतेस्तव या कार्यालयास प्राप्त झाला आहे. सदर कामांमध्ये लोकसभा तसेच विधानसभा सार्वत्रिक निवडणूक २०२४ च्या अनुषंगाने ईव्हीएम गोदामांमध्ये लोखंडी शटर्सची बाहेरील बाजू दोन विटांच्या थराची भिंत व सिमेंट कॉक्रीट वापरून बंद करणे, गोदामातील सर्व खिडक्यांना आतील बाजूने प्लायवूड फिटींग करुन बंद करणे, वीट बांधकाम, गिलावा, कोटेड पत्रा बसविणे, गोदामांसमोर मुरूम पसरणे, रंगकाम करणे व परिसर स्वच्छता करणे इत्यादी बाबींचा समावेश होता. गल्वनाईस्ड शीट्स व माईल्ड स्टीलचे दरात १० टक्के कपात पुनर्वापरासाठी गृहीत धरण्यात येवून सदर अंदाजपत्रकाच्या रकमेमध्ये अंशत: सुधारणा करण्यात करण्यात आलेली आहे.

२. सदर प्रस्तावाच्या छाननीअंती सुधारीत अंदाजपत्रकातील कामात समाविष्ट असलेल्या बाबींच्या किंमतीचे विवरण खालीलप्रमाणे आहे.

Recapitulation Sheet

| अ.क्र. | कामाचा तपशील | रक्कम |
|---|---|---|
| १. | विधानसभा निवडणूक २०२४ करीता शासकीय गोदाम, राजाराम तलावाजवळ, सरनोबतवाडी रोड, कोल्हापूर येथील गोदाम दुरुस्तीबाबत. | ७,४३,३६५.०० |
| | **एकुण** | **७,४३,३६५.००** |

| अ.क्र. | कामाचा तपशील | रक्कम |
| --- | --- | --- |
| १. | लोकसभा निवडणूक २०२४ करीता कोल्हापूर येथील गोदाम दुरुस्तीबाबत. | ५,०४,५२०.०० |
| | **एकुण** | **५,०४,५२०.००** |

३. वरील दोन्हीतक्त्यात नमूद केल्यानुसार विषयांकित कामाच्या रु.७,४३,३६५.००/-व रु.५,०४,५२०.००/- अशा एकूण रु.१२,४७,८८५/- **(रुपये बारा लक्ष सत्तेचाळीसहजार आठशे पंच्याऐंशी फक्त)** इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास शासन या आदेशाद्वारे खालील अटींच्या अधीन राहून कार्योत्तर प्रशासकीय मान्यता देत आहे.

a. ईव्हीएम व व्हीव्हीपॅटची कायमस्वरुपी साठवणूक करण्यासाठी दुरुस्ती करण्यात येणाऱ्या सदर गोदामांचे बांधकाम कमीत कमी खर्चात व भारत निवडणूक आयोगाच्या मार्गदर्शक तत्त्वांप्रमाणे गुणवत्तापूर्ण होईल याबाबतची जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील.
b. ईव्हीएम व व्हीव्हीपॅट मशीन्सच्या साठवणुकीकरीता भारत निवडणूक आयोगाच्या (ECI) दि.०८.०८.२०१७, दि.१२.०३.२०१९ तसेच भारत निवडणूक आयोगाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना विचारात घेवून सदर गोदामांचे दुरुस्तीचे काम दर्जेदार होईल याची दक्षता घेण्यात यावी.
c. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
d. विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येणार नाही याद्दष्टीने दक्षता घेवून काम लवकरात लवकर पूर्ण करण्यात यावे.
e. काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.
f. गोदाम दुरुस्तीकरीता भाड्याने घेतलेल्या वस्तु पुढील निवडणूकीकरीता वापरण्यात येणार किंवा कसे व खरेदी करण्यात आलेल्या वस्तु मुदत संपल्यानंतर त्याचे निर्लेखन करुन येणारी किंमत शासकीय लेख्यात जमा करण्यात यावी.
g. वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९ मधील मुद्दा क्र. ३ अन्वये व सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/ प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९ अन्वये किरकोळ नागरी बांधकामासाठी रु.१५.०० कोटीपेक्षा कमी किंमत असलेल्या अंदाजपत्रकीय रकमेच्या कामांच्या ढोबळ अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिकाऱ्याने तांत्रिक सहमती प्रदान केल्यानंतर, क्षेत्रिय स्तरावरील सर्वोच्च तांत्रिक अधिकारी असलेल्या संबंधित मुख्य अभियंता यांचे शिफारशीसह प्राप्त अंदाजपत्रकानुसार उपभोक्ता विभागाने प्रशासकीय मान्यता प्रदान करावी, असे नमूद केलेले आहे. त्यानुषंगाने गोदाम दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास क्षेत्रिय स्तरावरील सर्वोच्च तांत्रिक अधिकारी असलेल्या संबंधित

मुख्य अभियंता यांची शिफारस आवश्यक आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदींनुसार प्रस्तुत कामाबाबत सर्व जबाबदारी ही संबंधित अधिकाऱ्यांची राहील.

४. प्रस्तुत मान्यता ही वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९ मधील मुद्दा क्र. ३ अन्वये व सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९ अन्वये तसेच नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.ससमा २०१०प्र.क्र.४८ (भाग-१)/का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८ नुसार प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३२६१५०२४८०१०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

MANOHAR RAMCHANDRA PARKAR

Digitally signed by MANOHAR RAMCHANDRA PARKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=c4c0810e9c94cf92d42a36d93c8f7b6ac18542c1ee758c9cfddcea906d9cf544, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FB43688343316856C0F7E793462127AA87FCE45724E87929C6889798CD7D2C62, cn=MANOHAR RAMCHANDRA PARKAR
Date: 2025.03.26 15:03:49 +05'30'

**(मनोहर पारकर)**
**उप सचिव व सहमुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रति -:**

जिल्हाधिकारी तथा जिल्हा निवडणूक अधिकारी ,कोल्हापूर

**प्रत-**

१. महालेखापाल महाराष्ट्र१ (लेखा व अनुज्ञेय)मुंबई.
२. महालेखापाल महाराष्ट्र२ (लेखापरिक्षा), नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, कोल्हापूर
४. निवासी लेखापरिक्षा अधिकारी,वांद्रे(पू.),
५. मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग, पुणे
६. अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, कोल्हापूर
७. कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, कोल्हापूर
८. निवडनस्ती (सा.प्र.वि. कार्यासन ३३).